साखर आयुक्त, पुणे यांच्या अधिपत्याखालील प्रादेशिक सह संचालक ( साखर ) सोलापूर या नवीन कार्यालयातील ८ अस्थायी पदाना मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन,**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ससाका-२०२० /प्र.क्र.१८ /२५स,**
मंत्रालय , मुंबई ४०० ०३२,
दिनांक: २६.२.२०२०

वाचा:- १. शासन निर्णय,सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग,क्रमांक:-राजस-१००८/प्र.क्र.५३८/५-स, दि.५/५/२०११.
२. सहकार आयुक्त व निबंधक, पुणे यांचे पत्र क्र. आस्था / कक्ष-१ / सुधा. आकृतीबंध / पदेवाटप / २०११, दि. २८/१२/२०११.
३. वित्त विभाग पृष्ठांकन क्र. पदानि २०१८/ प्र.क्र.११८/१८/ आपुक दि.१.१.२०१९
४. शासन निर्णय,सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग,क्रमांक:- स सा का २०२०/ प्र.क्र.१८ /२५-स, दि.२४.१.२०१९
५. शासन निर्णय वित्त विभाग क्र. पदनि २०१६ / प्र.क्र.८/१६ / आपुक दि. २१.२.२०१९
६. शासन निर्णय वित्त विभाग क्र. पदनि २०१६ / प्र.क्र.८/१६ / आपुक दि. ११.०९.२०१९
७. सहकार आयुक्त व निबंधक, पुणे यांचे आदेश क्र. आस्थापना / कक्ष-१ / प्रासहसा / सोलापूर/अराप/कर्मसमावेशन/२०१९/दि. ७.११.२०१९
८. विभागीय सहा निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांचे आदेश क्रमांक जा.क्र. विपु/ आस्था-०१/प्रास सं साखर/सोलापूर/कर्म.समा.आदेश/सन २०१९ दि.१०.१२.२०१९
९. सहकार आयुक्त व निबंधक, पुणे यांचे पत्र क्र. आस्था / कक्ष-१ / प्रास ह सा / सोलापूर/ अराप/ कर्म समावेशन/२०२०/८७ दि. २७.१.२०२०
१०. साखर आयुक्त, पुणे यांचे पत्र क्रमांक सा आ / प्रशा-१/ प्रा स स सोलापूर मुदतवाढ/२०२०/८११५ दि.४.२.२०२०

**प्रस्तावना:**

उपरोक्त वाचा-४ येथील दि. २४.१.२०१९ च्या शासन निर्णयान्वये सोलापूर जिल्ह्यातील साखर कारखान्यांची संख्या आणि ऊस गाळपाचे प्रमाण विचारात घेवून सोलापूर येथे स्वतंत्र प्रादेशिक सह संचालक (साखर), सोलापूर हे प्रादेशिक कार्यालय सुरु करण्यास शासनाची मान्यता देण्यात आली आहे. सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था महाराष्ट्र राज्य, पुणे या कार्यालयाने उपरोक्त वाचा -९ येथील दि. २७.१.२०२० च्या पत्रान्वये पदांच्या समावेशनाबाबत माहिती सादर केली आहे. तसेच उपरोक्त वाचा- १० येथील साखर आयुक्त ,पुणे यांनी दि. ४.२.२०२० च्या पत्रान्वये सदर कार्यालयातील ८ अस्थायी पदे दिनांक १/२/२०१९ ते २८/२/२०२० पर्यंत चालू ठेवण्यास मंजूरी देणेबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. त्यानुसार सद्यस्थितीत प्रादेशिक सह संचालक (साखर), सोलापूर या कार्यालयातील मंजूर ८ अस्थायी पदे दिनांक १.२.२०१९ पासून दिनांक २९.२.२०२० पर्यंत चालू ठेवण्यास मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय-

उपरोक्त वाचा-४ येथील दि. २४.१.२०१९ च्या शासन निर्णयान्वये सोलापूर जिल्ह्यातील साखर कारखान्यांची संख्या आणि ऊस गाळपाचे प्रमाण विचारात घेवून सोलापूर येथे स्वतंत्र प्रादेशिक सह संचालक (साखर), सोलापूर हे प्रादेशिक कार्यालय सुरु करण्यास शासनाची मान्यता देण्यात आली आहे. सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था महाराष्ट्र राज्य,पुणे या कार्यालयाने उपरोक्त वाचा - ९ येथील दि. २७.१.२०२० च्या पत्रान्वये सादर केलेली माहिती आणि उपरोक्त वाचा-१० येथील साखर आयुक्त ,पुणे यांनी दि. ४.२.२०२० च्या पत्रान्वये प्राप्त झालेल्या प्रस्तावानुसार प्रादेशिक सह संचालक (साखर), सोलापूर कार्यालयातील ८ अस्थायी पदे दिनांक १/२/२०१९ ते २८/२/२०२० पर्यंत चालू ठेवण्यास, " सदर कालावधीत कोणत्याही परिस्थितीत विभागाच्या आस्थापनेवरील आणि विभागाच्या नियंत्रणा खालील क्षेत्रीय कार्यालयाच्या आस्थापनेवरील मंजूर पदांचा आढावा घेवून, सुधारित आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेण्यात येईल" या अटीच्या अधीन राहून मंजूरी देण्यात येत आहे. .

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | एकूण पदे |
|---|---|---|---|
| १. | **सहसंचालक** | १५६००-३९१०० + ग्रेड पे ६६०० | १ |
| २. | **उप संचालक** | १५६००-३९१०० + ग्रेड पे ५४०० | १ |
| ३. | **सहकार अधिकारी श्रेणी-२** | ९३००-३४८०० ग्रेड पे ४२०० | १ |
| ४. | **वरिष्ठ लिपिक** | ५२००-२०२०० ग्रेड पे २४०० | १ |
| ५. | **लघुटंकलेखक** | ५२००-२०२०० + ग्रेड पे २४०० | १ |
| ६. | **कनिष्ठ लिपिक.** | ५२००-२०२००+ ग्रेड पे १९०० | १ |
| ७. | **वाहनचालक** | ५२००-२०२००+ ग्रेड पे १९०० | १ |
| ८. | **शिपाई** | ४४४०-७४४०+ ग्रेड पे १३०० | १ |
| | | **एकूण** | ८ |

२. सदर मुदत वाढीच्या कालावधीनंतर सुधारित आकृतीबंध निश्चित करण्याकरीता कालावधी वाढवून देण्यात येणार नाही, याची आस्थापना - १ कार्यासन आणि कार्यासन ५-स यांनी नोंद घ्यावी. तसेच खुद्द आस्थापनेवरील पदांचा तसेच , विभागाच्या नियंत्रणाखालील क्षेत्रीय कार्यालयाच्या आस्थापनेवरील पदांचा आढावा घेवून, सुधारित आकृतीबंधाचा प्रस्ताव तातडीने वित्त विभागास सादर करावा.

३. यावरील खर्च, " मागणी क्र. व्ही-२ , २४२५- सहकार, ००१ संचालन व प्रशासन ,(०१) संचालन व प्रशासन, (०१) (०८) साखर आयुक्तालयाचे बळकटीकरण (२४२५ १०५४) (अनिवार्य) " ह्या लेखाशीर्षाखाली उपलब्ध तरतुदीमधून करण्यात यावा.

४. सदरहू शासन निर्णय हा , वित्त विभाग शासन निर्णय क्र. पदनि २०१६ / प्र.क्र.८/१६ / आपुक दि. २१.२.२०१९ आणि क्र. पदनि २०१६ / प्र.क्र.८ / १६ / आपुक दि. ११.०९.२०१९ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे .

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०२००२२६१५४५२९१००२** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Pramod Mankoji Valanj

Digitally signed by Pramod Mankoji Valanj
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-Operation, Marketing and Textiles Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e9e7fafe78ccbad1148295b75b2b4a0fc30e01ea267cb61e5d741e2bf211f323, cn=Pramod Mankoji Valanj
Date: 2020.02.26 15:49:07 +05'30'

**( प्रमोद वळंज )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सहकार आयुक्त तथा निबंधक सहकारी संस्था , महाराष्ट्र राज्य, पुणे
२. साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे (३ प्रती)
३. महालेखापाल -१, महाराष्ट्र राज्य, (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा ) मुंबई.
४. महालेखापाल -२, महाराष्ट्र राज्य, (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा ) नागपूर
५. वित्त विभाग ( अर्थसंकल्प -३/ व्यय-२/वित्तीय सुधारणा-१/ आ.पू.क. )मंत्रालय, मुंबई
६. संचालक (प्रशासन), साखर आयुक्तालय, साखर संकुल, पुणे.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे / सोलापूर (३प्रती )
८. लेखाधिकारी, साखर आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे
९. सर्व प्रादेशिक सहसंचालक (साखर) पुणे /सोलापूर/कोल्हापूर / अहमदनगर/ नांदेड/ औरंगाबाद / अमरावती/ नागपूर
१०. उप सचिव ( आस्था ) / ( अर्थसंकल्प), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
११. अवर सचिव ( कार्यासन ५-स ) / कक्ष अधिकारी ( आस्थापना )
१२. सर्व अधिकारी / कार्यासने, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. निवड नस्ती कार्यासन २५-स / ३-स